एका पदावरून दुसऱ्या नवीन पदावर नियुक्त होत असताना त्या दुसऱ्या पदावरील कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या पहिल्या पदापेक्षा अधिक नसतील तेव्हा करावयाची वेतननिश्चिती व त्यासाठी द्यावयाचा विकल्प.

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

शासन परिपत्रक क्र. वेतन-१२८९/प्र. क्र./४६/सेवा-३

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १९ जून १९९०

पहा.—शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. वेतन-१२८९/प्र. क्र. ४६/सेवा-३, दिनांक ३ एप्रिल १९९०

शासन निर्णय

शासकीय कर्मचाऱ्याची निवडश्रेणीतील पदावर नियुक्ती झाल्यानंतर महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या नियम ११ (४) अन्वये त्याचे वेतन, अशा नियुक्तीच्या लगतपूर्वी त्याला जे वेतन मिळत होते त्याच्या लगत वरच्या टप्प्यावर निश्चित करण्यात येते. परंतु सध्या अशा कर्मचाऱ्याला जुन्या पदावरील पुढील वेतनवाढीच्या दिनांकापासून वेतननिश्चिती करण्याचा विकल्प उपलब्ध नाही. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक वेतन-१२८९/प्र. क्र. ४६/सेवा-३, दिनांक ३ एप्रिल १९९०च्या परिच्छेद २ अनुसार एका पदावरून दुसऱ्या नवीन पदावर नियुक्त झाल्यानंतर त्या दुसऱ्या पदावरील कर्तव्ये व जबाबदाऱ्या पहिल्या पदापेक्षा अधिक नसतील तेव्हा महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या नियम ११ (२) अन्वये वेतननिश्चिती कशी करावयाची यासंबंधीचे जे आदेश काढण्यात आले आहेत, त्यात मात्र अशा कर्मचाऱ्याला जुन्या पदावरील वेतनश्रेणीमधील पुढील वेतनवाढीच्या दिनांकापासून वेतननिश्चिती करण्याचा विकल्प देण्यात आला आहे. शासन निर्णय, दिनांक ३ एप्रिल १९९० च्या परिच्छेद ३ च्या धर्तीवर निवडश्रेणी पदावर नियुक्त होणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्यांनाही वरीलप्रमाणे विकल्प देता येईल किंवा कसे याविषयीचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. शासनाने यासंबंधी असा निर्णय घेतला आहे की, महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या नियम ११ (४) अन्वये शासकीय कर्मचाऱ्याची निवडश्रेणीमध्ये वेतननिश्चिती करताना संबंधित कर्मचाऱ्याला, शासन निर्णय, दिनांक ३ एप्रिल १९९० च्या परिच्छेद ३ च्या धर्तीवर, खालीलप्रमाणे विकल्प देण्यात यावा :—

(अ) एकतर निवडश्रेणी पदावरील नियुक्तीच्या दिनांकापासून वेतननिश्चिती करावी, किंवा

(ब) जुन्या पदावरील वेतनश्रेणीमधील पुढील वेतनवाढीच्या दिनांकापासून वेतननिश्चिती करावी.

ह्या आदेशाची अंमलबजावणी दिनांक १ जानेवारी १९८६ पासून करण्यात यावी. दिनांक १ जानेवारी १९८६ किंवा त्यानंतर आणि हा शासन निर्णय निर्गमित होण्याच्या दिनांकापर्यंत जे कर्मचारी यापूर्वीच निवडश्रेणी पदावर नियुक्त झाले असतील, त्यांनी सदर विकल्प देण्याचा अखेरचा दिनांक ३१ ऑक्टोबर १९९० हा राहील. त्यानंतर ज्या शासकीय कर्मचाऱ्यांना निवडश्रेणी पदावर नियुक्ती मिळाली असेल त्यांना या आदेशानुसार वेतननिश्चितीसाठी विकल्प देण्यासाठी त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून एक महिन्याचा कालावधी देण्यात यावा. दोन्ही प्रकरणांमध्ये एकदा दिलेला विकल्प अंतिम समजण्यात यावा. विकल्पासंबंधीच्या व थकबाकी देण्यासंबंधीच्या अन्य तरतुदी शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ३ एप्रिल १९९० प्रमाणेच राहतील.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ३ एप्रिल १९९० च्या परिच्छेद ३ अन्वये १ जानेवारी १९८६ किंवा त्यानंतर आणि उपरोक्त शासन निर्णय निर्गमित होण्याच्या दिनांकापर्यंत जे कर्मचारी यापूर्वीच तत्सम दुसऱ्या नवीन पदावर नियुक्त झाले असतील त्यांना सदर शासन निर्णय निर्गमित होण्याच्या दिनांकापासून जास्तीत जास्त ३ महिन्यांचा कालावधी विकल्पासाठी देण्यात आलेला आहे. या मुदतीत वाढ करून शासन आता असा आदेश देत आहे की, सदर विकल्प देण्याचा अखेरचा दिनांकही ३१ ऑक्टोबर १९९० हा राहील. त्यानंतर देण्यात आलेला विकल्प स्वीकारण्यात येणार नाही.

३. शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ३ एप्रिल १९९० मधील परिच्छेद ३ मधील विकल्पाच्या पर्याय (ब) मध्ये " जुन्या पदावरील वेतनश्रेणीमधील नेहमीच्या वेतनवाढीच्या दिनांकापासून वेतननिश्चिती करावी " असे म्हटले आहे. त्याऐवजी " जुन्या पदावरील वेतनश्रेणीमधील पुढच्या वेतनवाढीच्या दिनांकापासून वेतननिश्चिती करावी " असे वाचावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अ. ना. कुळकर्णी,
उप सचिव, वित्त विभाग.

(शा.म.मु.) एच ८३६ (१०,०००—७-९०)

प्रति

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
मंत्रालयीन सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा), मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्रमांक २६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
उप मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.

* पत्राद्वारे